श्रमीक शिक्षण बहुउद्देशीय संस्था, होर्टी,
ता.तुळजापूर, जि.उस्मानाबाद संचलित
डॉ.बाबासाहेब आंबेडकर अस्थिव्यंग निवासी
विद्यालय,होर्टी या विद्यालयास वाढीव विद्यार्थी
संख्येस अनुदानीत मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- इडीडी-२०१४/प्र.क्र.८९/अ.क.१,
मंत्रालय विस्तार भवन,मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ८ ऑगस्ट , २०१४.

<u>वाचा :-</u>

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.इडीडी-२००१/प्र.क्र.५०२/सुधार-२, दिनांक १९ जुलै २००३.
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,क्र.इडीडी-२००३/प्र.क्र.३४०/भाग-२/सुधार-२,दि.१८.०८.२००४ व दि.३०.०१.२००६
३) शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,क्र.इडीडी २००५/प्र.क्र.६८/अ.क.१ दिनांक २३/०५/२००६.
४) आयुक्त,अपंग कल्याण यांचे पत्र क्र.अकआ/प्र-३/अस्थि/वाढीव विद्या/पद/मंजूरी/२०११/२०१२/२५४, दि.२५.०२.२०१४.

**<u>प्रस्तावना</u>:**

श्रमीक शिक्षण बहुउद्देशीय संस्था, होर्टी, ता.तुळजापूर, जि.उस्मानाबाद संचलित डॉ.बाबासाहेब आंबेडकर अस्थिव्यंग निवासी विद्यालय,होर्टी या अस्थिव्यंग शाळेस ५० अनुदानीत निवासी विदयार्थी संख्येस सदर्भित क्र.(३) च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आली आहे, त्यानुसार आयुक्त,अपंग कल्याण पुणे यांच्या दि ०२.०७.२०१३ च्या आदेशान्वये उपरोक्त ५० निवासी (अनुदानींत)व २५ निवासी (कायमस्वरुपी विनाअनुदानीत)अशी एकूण ७५ निवासी विद्यार्थी

संख्येस मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने सदरील वाढीव २५निवासी विद्यार्थी संख्येस अनुदान तत्वावर मान्यता मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय** :- अपंग शाळा संहिता १९९७ प्रकरण-दोन,भाग-२,परिच्छेद क्र.११ नुसार श्रमीक शिक्षण बहुउद्देशीय संस्था, होर्टी, ता.तुळजापूर, जि.उस्मानाबाद संचलित डॉ.बाबासाहेब आंबेडकर अस्थिव्यंग निवासी विद्यालय,होर्टी या शाळेच्या कायमस्वरुपी विना अनुदान तत्वावर मंजूरी देण्यात आलेल्या २५ वाढीव निवासी विद्यार्थी संख्येस सन २०१४-१५ पासून खालील अटींच्या अधिन राहून अनुदान तत्वावर आणण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर विशेष शाळेच्या वाढीव २५ विद्यार्थी संख्येस त्या-त्या शैक्षणिक वर्षापासून पुढील वर्गास नियमानुसार आणि आर्थिक क्षमतेनुसार अनुदान अनुज्ञेय राहील.
२) सदरहू शाळेची वाढीव २५ विद्यार्थी संख्या ही पहिली ते सातवीच्या वर्गासाठी अनुज्ञेय राहील. त्यामध्ये शासनाच्या मान्यतेशिवाय बदल करता येणार नाही.
३) अनुदान मान्यतेबाबतच्या विहित अटी व शर्ती आणि कार्यपध्दतीची पूर्तता झालेली असल्याबाबतची खातरजमा आयुक्त,अपंग कल्याण,पुणे यांनी करुन घ्यावी.
४) सदरहू शाळेस शासन वेळोवेळी निश्चित करेल असे नियम,अटी व शर्ती लागू राहतील.
५) आयुक्त,अपंगकल्याण,पुणे यांनी सदर शाळेची मान्य संख्या विचारात घेऊन निश्चित करण्यात आलेल्या आकृतीबंधानुसार देय असणारी पदे मंजूरीसाठीच्या प्रस्तावाचे अनुषंगाने शासनस्तरावरुन कार्यवाही सुरु असून प्रस्तावित पदावरील वेतन व भत्ते,वेतनेतर अनुदान,अनुज्ञेय होणारे परिपोषण अनुदान व नियमानुसार अनुज्ञेय इमारत भाडे यासाठी पुरवणी मागणीचा प्रस्ताव सादर करावा.
६) सदरहू शाळेस केंद्र शासन,स्थानिक संस्थांकडून किंवा इतर संस्थांकडून अनुदान मिळत आहे असे निदर्शनास आल्यास संस्थेस राज्य शासनाचे अनुदान मिळणार नाही.
७) शासनाने अपंग शाळांना अनुदान तत्वावर आणण्याकरीता वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्ती आणि कार्यपध्दतीने पालन झालेले नाही ,असे आढळून आल्यास सदरहू संस्थेची मान्यता रद्द करण्यात येईल.

२. वरील मान्यतेनुसार डॉ.बाबासाहेब आंबेडकर अस्थिव्यंग निवासी विद्यालय होर्टी ता.तुळजापूर जि उस्मानाबाद या शाळेची एकूण अनुदानीत निवासी विद्यार्थी संख्या ७५ अशी होईल.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४८६/व्यय १४, दिनांक ०७.०७.२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१४०८१११६३४३७१९२२ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Pratap Pandurang Lubal

Digitally signed by Pratap Pandurang Lubal
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pratap Pandurang Lubal
Date: 2014.08.11 16:33:10 +05'30'

(प्र.पां.लुबाळ)

अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

१) आयुक्त,अपंग कल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे,

२) प्रादेशिक उपायुक्त,समाजकल्याण विभाग,लातूर,

३) मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, उस्मानाबाद,

४) जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, उस्मानाबाद,

५) महालेखापाल,महाराष्ट्र-१,२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,

६) जिल्हा कोषागार अधिकारी,उस्मानाबाद,

७) वित्त विभाग ( का.व्यय-१४) ,मंत्रालय,मुंबई.

८) अध्याक्ष/सचिव,श्रमीक शिक्षण बहुउद्देशीसंस्था,होर्टी,ता.तुळजापूर,जि.उस्मानाबाद.

९) मुख्यांध्यापक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर अस्थिव्यंग निवासी विद्यालय,होर्टी,

१०) निवड नस्ती,अ.क.१